**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाच्या नांवे स्वीय प्रपंजी लेखा (PLA) सुरु करणे बाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : शविम-२००९/प्र.क्र.८३/का-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०१०..

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्र.आविवि-२००४/प्र.क्र.१५/का-३, दिनांक २४-८-२००४
२) शासन निर्णय क्र. शविम-२००९/प्र.क्र.८३/का-३, दि. २९ मार्च, २०१०
३) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.संकिर्ण-१००८/प्र.क.९९/कोषां प्र-५, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१०.
४) महाराष्ट्र कोषागारे नियम क्र. ४९४ व अनुषंगीक तरतुदी.

<u>प्रस्तावना</u> :- शासन निर्णय दिनांक २४-८-२००४ अन्वये शासनाने शबरी आदिवासी व वित्त विकास महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रुपये १००.०० कोटी वरुन रुपये २००.०० कोटी करण्यास मंजूरी दिलेली असून सन २००८-०९ पर्यंत रुपये २८.२३ कोटी एवढे भाग भांडवली अंशदान महामंडळास उपलब्ध करुन दिलेले आहे. उपरोक्त अ.क्र.२ येथील शासन निर्णय, दि.२९ मार्च, २०१० अन्वये शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास सन २००९-१० करीता भाग भांडवली अशंदानापोटी रुपये ४००.०० लक्ष एवढा अर्थसंकल्पीत करण्यात आलेला निधी वितरित करण्यात आलेला आहे. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास शासनाकडुन देण्यात येणारा निधी हा भाग-भांडवली अंशदाने या स्वरुपात देण्यात येत आहे. राज्याच्या अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार प्रशासकीय विभाग सदर रक्कम कोषागारातुन आहरण करुन संबंधीत महामंडळास हस्तांतरीत करीत असे. साहजिकच प्रत्यक्ष कर्ज वाटताना शासनाकडुन रक्कम आहरीत झाल्यापासुन विहीत प्रयोजनार्थ त्याचा वापर होईपर्यंत संबंधीत महामंडळांच्या बँक खात्यात ही रक्कम जमा करण्यात येते.

<u>शासन निर्णय</u> :- उपरोक्त शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाचे भाग-भांडवली अंशदान संबंधीत महामंडळाच्या बँक खात्यात जमा करण्याऐवजी सन २००९-२०१० पासुन भाग भांडवली अंशदानापोटी शासनाकडुन वितरीत होणारी तरतुद ही महामंडळाचे नाशिक येथील शासकीय कोषागारात स्वीय प्रपंजी लेखा (PLA ) खाते उघडण्यास व सदरची तरतुद नाशिक येथील शासकीय कोषागारातील उघडलेल्या स्वीय प्रपंजी लेखा ( PLA ) खात्यात जमा करण्यास या शासन निर्णयान्वये खालील अटींवर मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर स्वीय प्रपंजी लेखा हा कार्यान्वित करणेस व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. यापुढे स्वीय प्रपंजी लेख्यास शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक स्वीय प्रपंजी लेखा असे संबोधण्यात येईल व हा लेखा कोषागाराच्या लेखापरिक्षेच्या अधिन राहुन स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यास शासन अनुमती देत आहे.

२. सदर स्वीय प्रपंजी लेख्याचे प्रशासक म्हणुन व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक हे काम करतील व त्यांच्या पदनामाने नाशिक जिल्हा कोषागारात हा स्वीय प्रपंजी लेखा उघडला जाईल. स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यासाठी महालेखापाल यांची मान्यता तसेच आवश्यक ती कार्यवाही शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यानी करावी.

३. स्वीय प्रपंजी लेखामध्ये कोणता निधी जमा करावा या बाबी स्पष्टपणे खाली नमुद करण्यात येत आहेत :-

१) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांना देय होणारे भाग-भांडवली अंशदान व मार्जिन मनी .

२) भांडवली अंशदानाची लाभार्थ्यांकडुन होणारी प्रतिपुर्ती.

३) राज्य सरकार वेळोवेळी स्वतंत्र व परिपुर्ण आदेशाने आदेशित करेल अशा रक्कमा.

४. स्वीय प्रपंजी लेखामध्ये अन्य कोणत्याही रक्कमा जमा करता येणार नाहीत. तसेच या निधीत कोणतीही रक्कम खर्च होत नाही म्हणुन जमा करता येणार नाही.

५. या स्वीय प्रपंजी लेख्यातुन महामंडळ राबवित असलेल्या केवळ स्वयंरोजगार खालील योजनांचे कर्ज हिश्याचे मार्जिन मनी अदा करता येईल.

अ) एन.एस.टी.एफ.डी.सी. नवी दिल्ली पुरस्कृत कर्ज योजनेअंतर्गत राज्य सरकारने भरावयाचा १५ टक्के मार्जिन मनी रक्कम.

ब) एन.एस.टी.एफ.डी.सी. नवी दिल्ली पुरस्कृत कर्ज योजनेअंतर्गत आदिवासी महिला सशक्तीकरण योजना अंतर्गत राज्य सरकारने भरावयाचा २० टक्के मार्जिन मनी रक्कम.

क) राष्ट्रीयकृत बँकेच्या सहकार्याने व पुरस्कृत कर्ज योजनेअंतर्गत राज्य सरकारने भरावयाचा १५/ २० टक्के मार्जिन मनी रक्कम.

ड) राज्य शासन किंवा एन.एस.टी.एफ.डी.सी. नवी दिल्ली विशेष निर्देश देवुन अंमलात आणणा-या योजनांचा कर्जाचा राज्य हिस्सा.

६. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक मार्फत राबविण्यात येणा-या स्वयंरोजगार योजनांचे सर्व प्रदान फक्त धनादेशाव्दारे करण्यात येईल. महामंडळ कोषागारात फक्त धनादेश सादर करेल. यासाठी आवश्यक असणारे धनादेश कोषागारातुन प्राप्त करुन घ्यावेत. स्वीय प्रपंजी लेख्यातुन खर्च करतांना पुरेसे अंशदान आहे तसेच एन.एस.टी.एफ.डी.सी. चा अधिकृत निधी उपलब्ध आहे याचा तपशिल द्यावा लागेल. तसेच कोणताही महसुली खर्च केला जाणार नाही याची दक्षता महामंडळाने घ्यावी.

७. कोषागारात सादर होणारे धनादेश हे महामंडळाच्या नियमाप्रमाणे किमान दोन सहस्वाक्षरी असणारे असतील. त्यातील पहिली स्वाक्षरी महाव्यवस्थापक ( वित्त ) यांची व दुसरी स्वाक्षरी व्यवस्थापकीय संचालक यांची असेल. असेही प्रमाणित करण्यात येते की, आज हे दोन्ही अधिकारी शासकीय सेवेतील असुन महामंडळास प्रतिनियुक्तीवर आहेत.

८. या स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये सतत तीन वर्षे व्यवहार न झाल्यास कोषागार नियम-१९६८ मधील नियम ४९५ च्या तरतुदीप्रमाणे विहित कार्यपद्धती अनुसरुन कोषागार अधिका-याने उक्त खाते बंद करण्याची कार्यवाही करावी.

९. सदर लेख्याचे पासबुक दरमहा कोषागाराकडे पाठवावे. आर्थिक वर्ष संपताच वर्षाअखेर स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये (PLA) शिल्लक असलेल्या रक्कमेचे शिल्लकी प्रमाणपत्र संबंधित अधिका-याने / प्रशासकाने कोषागार अधिका-यांना पाठवावे. सदरचे पासबुक सलग तीन महिने कोषागाराकडे न पाठविल्यास किंवा आर्थिक वर्ष संपताच पुढील ३१ मे च्या आत शिल्लक रक्कमेचे प्रमाणपत्र न पाठविल्यास सदर कार्यवाही पुर्ण होईपर्यंत कोषागाराकडुन पुढील प्रदाने केली जाणार नाहीत.

१०. स्वीय प्रपंजी लेख्यामधील शिलकीचा कोषागार लेख्याबरोबर ताळमेळ घेण्याची जबाबदारी संबंधीत प्रशासकावर राहील.

११. कोषागारासाठी लेखांकन नियम १९६८ मधील पी.एल.ए. (PLA) विषयक सर्व तरतुदी लागु राहतील.

१२. तपशिलवार लेखे योग्य रितीने ठेवणे, महालेखापाल यांना विहित नियतकालिक लेखे व नियतकालिक विवरणे सादर करण्याची जबाबदारी संबंधीत प्रशासकाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३२९१८४९०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(सो. ना. बागुल)**
**अवर सचिव**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ,मर्या. नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र.१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लंखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
महालेखापाल (वाणिज्य) महाराष्ट्र, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग, ( साऊ) (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई .३२.
नियोजन विभाग (का. १४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, लेखापरिक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, मर्हषि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
क.अ. (का-१, ६ व ७), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का-३),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.